**"राज्यातील सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये संस्था व्यवस्थापन समिती/ (Institute Management Committee) ची स्थापना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : आयएमसी-२०१९/प्र.क्र.२००/व्यशि-३
मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

औद्योगिक प्रशिक्षण संस्थाअंतर्गत व्यवसायाभिमुख प्रशिक्षण देवून प्रशिक्षणार्थींना रोजगारक्षम बनविण्याचे उद्दिष्ट ठेवण्यात आलेले आहे. त्याकरिता औद्योगिक आस्थापनांना सुसंगत असे व्यवसाय अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण देवून प्रशिक्षणार्थींना औद्योगिक आस्थापनेत असलेल्या कामाच्या यंत्रसामुग्रीअनुरुप प्रशिक्षण देवून त्यांना रोजगारक्षम बनविण्यात येते.

२. त्याकरिता औद्योगिक प्रशिक्षण संस्था या अधिकाधिक उदयोगस्नेही असणे गरजेचे आहे. तसेच प्रशिक्षणार्थींना तेथे पोषक वातावरण व चांगले प्रशिक्षण देखील मिळणे गरजेचे आहे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत अत्याधुनिक यंत्रसामुग्री व नवीन तंत्रज्ञानावर आधारित औद्योगिक आस्थापना अनुरुप अभ्यासक्रम राबविणे गरजेचे आहे. त्यासाठी P.P.P. (Public Private Partnership) व STRIVE (Skill Strengthening for Industrial Value Enhancement) या योजनेंतर्गत येणाऱ्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेची दर्जावाढ करण्याकरीता, त्यांच्या समस्या सोडविण्याकरीता संस्था व्यवस्थापन समिती (IMC) स्थापन करण्यात आल्या आहेत. महाराष्ट्रामध्ये सद्यस्थितीत असलेल्या ४१७ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी २८६ संस्थेमध्ये संस्था व्यवस्थापन समितीची स्थापना करण्यात आलेली आहेत.

३. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दि. १२ जुलै, २००२ अन्वये संस्था व्यवस्थापन समिती स्थापन करण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये संस्था व्यवस्थापन समितीची रचना, कर्तव्ये व जबाबदाऱ्या देण्यात आलेल्या आहेत. P.P.P. (Public Private Partnership) व STRIVE (Skill Strengthening for Industrial Value Enhancement) या योजनेंतर्गत येणाऱ्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत आय.एम.सी. स्थापन करण्यात आलेली आहे. राज्यातील १२ औ.प्र.सस्थांमध्ये केंद्र पुरस्कृत सेंटर ऑफ एक्सलन्स योजना सन २००५ पासून राबविण्यात आली होती. ही योजना सदर आय.एम.सी च्या माध्यमातून राबविण्यात आली होती.

४. जागतिक बँकेच्या सहाय्याने व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्प राबविण्यासाठी ८७ औ.प्र.संस्थांमध्ये स्वतंत्र व्यवस्थापन समितीची स्थापना करण्यास उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दिनांक ३० जून, २००७ च्या शासननिर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. या संस्था व्यवस्थापन समितीला केंद्र शासनाकडुन उपलब्ध होणारा निधी खर्च करण्यासंबंधी मर्यादित वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले होते.

५. "पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप व्दारे औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ करणे" हया केंद्र पुरस्कृत योजनेमध्ये सन २००७-०८ ते सन २०११-१२ या कालावधीत राज्यातील २५० शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा समावेश करण्यांत आला होता. सदर २५० शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दिनांक ३१ मार्च, २००८ रोजीच्या शासन निर्णयानुसार **संस्था व्यवस्थापन समिती (आय.एम.सी)** स्थापना करुन सोसायटी रजीस्ट्रेशन अॅक्ट खाली नोंदणी करण्यात आलेली आहे व आय.एम.सी च्या नावाने स्वतंत्र बँक खाते उघडण्यात आलेले आहे.

६. कौशल्य विकास व उदयोजकता विभागाच्या दिनांक २२ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयान्वये जागतिक बँक सहाय्यित केंद्रीय योजना "औद्योगिक मूल्य वृध्दीकरणासाठी कौशल्यांचे बळकटीकरण करणे" STRIVE (Skill Strengthening for Industrial Value Enhancement) प्रकल्पातंर्गत पहिल्या टप्यात शासकीय ३८ औ.प्र.संस्थांमध्ये स्वतंत्र व्यवस्थापन समितीची स्थापना करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनाकडुन उपलब्ध होणारा निधी खर्च करण्यासंबंधी या आय.एम.सी ला खालीलप्रमाणे खरेदीविषयक वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

| **शासकीय/खाजगी औ.प्र.संस्था** | **प्रशासकीय व वित्तीयअधिकार (प्रति करार)** |
|---|---|
| प्राचार्य, औ.प्र.संस्था तथा सदस्य सचिव, संस्था व्यवस्थापन समिती | रू. १.०० लाखापर्यंत |
| बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी समिती | रू.१.०० लाख ते रू.१०.०० लाखापर्यंत |
| संस्था व्यवस्थापन समितीची गव्हर्निंग काऊन्सिल (IMC) | रू. १०.०० लाख ते रू. २५.०० लाखापर्यंत |
| रू २५.०० लाख किंमतीच्या वरील खरेदी राज्य सुकाणू समितीच्या मान्यतेने राज्य प्रकल्प अंमलबजावणी कक्षाच्या स्तरावर करण्यास मान्यता देण्यात यावी | |

तथापि राज्यातील सर्व शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे उत्पन्न संस्थेच्या स्वीय प्रपंजी खात्यामध्ये (PLA) जमा केलेले असून विना वापर पडून आहे. सदर निधी आय.एम.सी च्या स्वतंत्र बॅक खात्यामध्ये हस्तांतरीत करुन त्या निधीचा वापर संस्थेचा दर्जावाढ करण्याकरीता होणे आवश्यक आहे. तसेच केवळ P.P.P. (Public Private Partnership) जागतिक बँक व STRIVE (Skill Strengthening for Industrial Value Enhancement) योजनेंतर्गत येणाऱ्या संस्थांमध्येच IMC असावी व इतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नाही, असा भेद न करता त्याव्यतिरिक्त शिल्लक राहिलेल्या १३१ संस्थामध्ये देखील संस्था व्यवस्थापन समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**<u>शासन निर्णय</u>** :-

राज्यातील सर्व शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये संस्था व्यवस्थापन समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. त्या अनुषंगाने संस्था व्यवस्थापन समितीची रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

❖ **संस्था व्यवस्थापन समितीची रचना :-**

| | | |
|---|---|---|
| १ | इंडस्ट्री पार्टनर किंवा इंडस्ट्री असोसिएशन किंवा त्यांचा प्रतिनिधी | अध्यक्ष |
| २ | Industry Partner ने (शक्यतो इंडस्ट्री असोसिएशन ने) नाम निर्देशित केलेले नजीकच्या उद्योगांचे तसेच औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये सुरू असलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमांशी निगडीत उद्योग/उद्योग समूहांचे तीन प्रतिनिधी. | सदस्य |
| ३ | संस्था व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष व प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था यांनी संयुक्तरित्या नाम निर्देशित केलेले शैक्षणिक क्षेत्रातील स्थानिक तज्ञ | सदस्य |
| ४ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील वरिष्ठ गट निदेशक/शिल्प निदेशक | सदस्य |
| ५ | अध्यक्ष यांनी प्राचार्यांच्या सल्ल्याने नामनिर्देशित केलेला विभागामधील उद्योगाचा प्रतिनिधी . | सदस्य |
| ६ | सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अथवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था | सदस्य सचिव |

२. तसेच, खाजगी व्यवस्थापनामार्फत चालविल्या जाणाऱ्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थाच्या नियामक मंडळाची (Governing Body) संस्था नोंदणी कायदा, १८६० किंवा कंपनी कायदा, २०१३ किंवा Maharashtra Public Trust Act,१९५० अंतर्गत नोंदणी करण्यात आलेली असल्यास, नियामक मंडळास संस्था व्यवस्थापन समितीचा दर्जा बहाल करण्यात येईल. अन्यथा अशा संस्थांमध्ये संस्था व्यवस्थापन समिती गठीत करण्यात येऊन वरील कायदयांतर्गत त्याची नोंदणी करणे बंधनकारक राहील.

३. प्राचार्य - औद्योगिक प्रशिक्षण संस्था आवश्यकतेनुसार सहसंचालक/जिल्हा व्यावसायिक व प्रशिक्षण अधिकारी/ सहायक आयुक्त, कौशल्य विकास व रोजगार उद्योजकता आयुक्तालय यांना IMC बैठकीसाठी आमंत्रित करु शकतील.

४. **वित्तीय अधिकार** - सर्व शासकीय/ खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण समितीस वित्तीय अधिकार खालीलप्रमाणे राहतील:-

| **शासकीय/खाजगी औ.प्र.संस्था** | **प्रशासकीय व वित्तीयअधिकार (प्रति करार)** |
|---|---|
| प्राचार्य, औ.प्र.संस्था तथा सदस्य सचिव, संस्था व्यवस्थापन समिती | रू. १.०० लाखापर्यंत |
| बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी समिती | रू.१.०० लाख ते रू.१०.०० लाखापर्यंत |
| संस्था व्यवस्थापन समितीची गव्हर्निंग काऊन्सिल (IMC) | रू. १०.०० लाख ते रू. २५.०० लाखापर्यंत |

हे संपूर्ण अधिकार IMC ला राहतील. रु.२५ लाखापर्यंत कोणत्याही तांत्रिक मान्यतेकरिता IMC ने प्रस्ताव राज्यस्तरावर पाठविण्याची आवश्यकता नाही.

तथापि, रू २५.०० लाख किंमतीच्या वरील खरेदी राज्य सुकाणू समितीच्या मान्यतेने राज्य प्रकल्प अंमलबजावणी कक्षाच्या स्तरावर करण्यास मान्यता देण्यात यावी.

५. **संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-**

१) संस्थेचा Institute Development Plan (IDP)/Institute Strategic Plan (ISP) तयार करणे व मान्यतेसाठी जिल्हा कौशल्य विकास समितीस सादर करणे.

२) संस्थेची दिर्घकालीन उद्दीष्टे /लक्ष्ये ठरविणे, औ.प्र.संस्थेला भेडसावणाऱ्या समस्या आणि आव्हानांचे विश्लेषण करणे व त्यांचा सामना करण्यासाठी धोरण निश्चित करणे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार संस्थेचे संकल्पात्मक खरेदी धोरण ठरविणे.

३) औ.प्र.संस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी लक्ष्य (Key Performance Indicators) निश्चित करणे, संस्थेच्या गरजेनुसार वर्षनिहाय आवश्यक निधीचा तपशिल तयार करणे.

४) औ.प्र.संस्थेच्या विकासासाठी प्रशिक्षक, यंत्र व साधनसामुग्री व इतर सेवांची गरज निश्चित करून त्यानुसार सुधारणात्मक कामे करणे.

५) केंद्र/ राज्य प्रकल्पांच्या अंमलबजावणी संदर्भातील औ.प्र.संस्थेच्या वतीने Performance Based Grant Agreement करणे.

६) केंद्र/राज्य प्रकल्पांतर्गत ISP नुसार करावयाच्या विविध कामांची विहीत वेळेत अंमलबजावणी करणे.

७) केंद्र/ राज्य प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या प्रगतीची देखरेख करणे.

८) केंद्र/राज्य प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने निश्चित केलेली खरेदी प्रक्रीया व लेखापरिक्षणासंबंधीत प्रक्रीयेचे पालन करणे.

९) केंद्र/राज्य शासनाचे विविध योजना उदा. PMKVY/PMKUVA/संकल्प औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सुरु करणे.

१०) MSBVE अंतर्गत विविध कौशल्य प्रशिक्षण अभ्यासक्रम स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर विषय सुरु करणे.

११) या अभ्यासक्रमाकरिता संस्था स्तरावर प्रवेश प्रक्रिया निश्चित करणे.

१२) संस्था व्यवस्थापन समितीला (IMC) स्वयंआर्थिक तत्वावर चालविण्यात येणाऱ्या कोर्सेसकरिता स्वतंत्र बँक खाते सुरु करावे लागेल .

१३) संस्था व्यवस्थापन समितीला (IMC) स्वयंआर्थिक तत्वावर चालविण्यात येणाऱ्या तुकड्यांसाठीच कंत्राटी पध्दतीवर कर्मचाऱ्यांची/ प्रशिक्षण संस्थेची नेमणूक करण्याचा अधिकार राहील. यासाठी कोणत्याही पद मान्यतेची गरज नाही.

१४) संस्था व्यवस्थापन समिती (IMC) च्या मान्यतेने घेण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या सेवा या संपूर्णपणे मानधन तत्वावर व IMC च्या मान्यतेने राहतील. याकरिता कोणतीही नवीन पदे शासन अथवा क्षेत्रीय यंत्रणेकडून निर्माण करण्यात येणार नाहीत.

१५) कोर्सचे शुल्क, PMKVY/PMKUVA/MSBVE निदेशकांच्या नियुक्ती संदर्भातील निर्णय घेणे व त्यांचे मानधन ठरविणे.

१६) संस्थेच्या कामकाजासाठी मानधन तत्वावर Data Entry Operator, लिपिक-टंकलेखक, Accountant यांच्या सेवा घेता येतील. याकरिता अंशकालीन कर्मचारी/ रोजगार कार्यालय इ.मध्ये नोंदणी केलेल्या व रोजगार नसलेल्या व्यक्तींचा प्राधान्याने विचार करावा.

१७) संस्थेच्या सुरक्षेकरिता सुरक्षा रक्षकांची मानधन तत्वावर शासनाच्या प्रचलित नियमानुसार/ सिक्युरिटी एजन्सीमार्फत नियुक्ती करण्यात यावी.

१८) शासकीय प्रचलित नियमानुसार वाहन भाडेतत्वावर घेण्याचे, वाहन असल्यास ड्रायव्हर मानधन तत्वावर घेण्याचे अधिकार राहतील.

१९) औ.प्र.संस्थांमध्ये लेखा सहायक हे पद आऊट सोर्सिंग पध्दतीने अथवा मानधन तत्वावर नियुक्त करण्याचे अधिकार संबंधित संस्था व्यवस्थापन समितीला (IMC) राहतील.

२०) औ.प्र.संस्थांमध्ये सफाई कामगार कंत्राटी हे पद कंत्राटी तत्वावर नियुक्त करण्याचे अधिकार संबंधित संस्था व्यवस्थापन समितीला (IMC) राहतील.

६. **अध्यक्ष, संस्था व्यवस्थापन समिती यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-**

१) संस्था व्यवस्थापन समितीस दूरदृष्टी देणे व केंद्र/ राज्य प्रकल्प/ कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी संस्था व्यवस्थापन समितीचे नेतृत्व करणे.

२) तातडीच्या वेळी सदस्य सचिव यांना अल्पावधीत विशेष सभा आयोजित करण्याबाबत सूचना देणे.

३) सोसायटीची कामे कार्यक्षमतेने तसेच Memorandum of Association, Rules and Regulation and bye laws of the Society (or equivalent) मधील तरतूदीं नुसार होत आहे किंवा नाही हे पहाणे.

४) अध्यक्षांच्या मते ज्या बाबी महत्वाच्या आहेत व त्यावर तात्काळ कार्यवाही करणे आवश्यक आहे व ज्यासाठी IMC ची बैठक आयोजित करण्यास पुरेसा वेळ उपलब्ध नाही तथापि, सदर बाबींची मंजूरी पुढील IMC बैठकीत घेणे शक्य आहे अशा बाबींवर आवश्यक निर्णय घेणे व सदर बाबींना मंजूरी घेण्यासाठी IMC ची बैठक आयोजित करणे.

५) Industry linkage, skill gap study याबाबतची आढावा घेऊन आवश्यकतेनुसार नियोजन व कृती आराखडा करणे.

६) प्रत्येक बैठकीचे इतिवृत्त तयार करुन संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व शासनास सादर करणे.

७) रोजगार व स्वयंरोजगार वाढीस लागण्याकरीता Seminar, Workshop चर्चासत्रे आयोजित करणे.

७. STRIVE योजनेच्या सूचनांप्रमाणे, सर्व औ.प्र.संस्थांच्या आय.एम.सी ला उपरोक्तप्रमाणे प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले असून त्याअंतर्गत निधी खर्च करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१६१४४४१५८८०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.03.16 14:47:42 +05'30'

( डॉ. सुवर्णा खरात )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, कौशल्य विकास व रोजगार उद्योजकता आयुक्तालय, मुंबई.
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह सचिव/ उप सचिव (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत).
९. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनायामार्फत).
१०. प्राचार्य, सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत).
११. सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी (उद्योग-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.